मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत नियुक्त करण्यात आलेले / येणारे वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरीक्षकांच्या (SSQM) मानधन, प्रवास भत्ता व दैनिक भत्याबाबत

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः मुग्रायो-२०१७/प्र.क्र.४३/पंरा-७
बांधकाम भवन, ७ वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: ७ एप्रिल, २०१७

वाचा -

१) शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दि.२८.१०.२०१५
२) केंद्रीय ग्रामीण रस्ते विकास संस्था, नवी दिल्ली यांचे कार्यालयीन आदेश क्र-१६७ दि.१०/०२/२०१७

शासन परिपत्रक

महाराष्ट्र राज्यातील न जोडलेल्या वाड्या-वस्त्या जोडण्यासाठी व ग्रामीण भागातील दुरावस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी राज्यात मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, ही महत्वकांक्षी योजना दिनांक २८.१०.२०१५ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या रस्त्यांच्या गुणवत्ता तपासणीकरीता १)कार्यकारी अभियंता स्तर २) राज्य गुणवत्ता निरीक्षक ३) वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरीक्षक (SSQM) अशी त्रिस्तरीय गुणवत्ता नियंत्रण कार्यपध्दती विहीत करण्यात आलेली आहे.

२. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत देखील रस्त्यांची गुणवत्ता तपासणीसाठी त्रिस्तरीय कार्यपध्दती अस्तीत्वात असून त्यामध्ये तिसऱ्या स्तरावरील तपासणी ही केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या राष्ट्रीय गुणवत्ता निरीक्षकांमार्फत (NQM) करण्यात येत असते. मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत रस्त्यांची तपासणी देखील प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत केल्या जाणाऱ्या गुणवत्ता तपासणी सारखी असावी या दृष्टीने प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत कार्यरत असलेल्या राष्ट्रीय गुणवत्ता निरीक्षकांची मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत रस्त्यांच्या कामांच्या तपासणीसाठी वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरीक्षक म्हणून नियुक्ती करण्याचे शासनाने ठरविलेले आहे. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत नियुक्त करण्यात येणारे राष्ट्रीय गुणवत्ता निरीक्षकांचे मानधन, दैनिक भत्ता व प्रवास भत्ता हे केंद्र शासनाकडून नियमित करण्यात येतात. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेतील राष्ट्रीय गुणवत्ता

निरीक्षकांची मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरीक्षक म्हणून नियुक्ती करण्यात येत असल्याने, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत राष्ट्रीय गुणवत्ता निरीक्षकांना कामांच्या तपासणीसाठी जे मानधन, दैनिक भत्ता व प्रवास भत्ता देण्यात येतो त्याच दराने वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरीक्षकांना मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत रस्त्यांच्या कामांच्या तपासणीसाठीचे मानधन, दैनिक भत्ता व प्रवास भत्ता देण्यात यावा.

३. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेतंर्गत राष्ट्रीय गुणवत्ता निरीक्षकांच्या मानधनात, दैनिक भत्त्यात व प्रवास भत्यामध्ये केंद्र शासनाकडून वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील ते सुधारीत दर मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरीक्षकांसाठी लागू राहतील.

४. यासाठी येणारा खर्च मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठीच्या मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०७१३५९४४२६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R A Nagargoje

Digitally signed by R A Nagargoje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, cn=R A Nagargoje
Date: 2017.04.07 16:47:33 +05'30'

**(र.आ. नागरगोजे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, कॅम्प ऑफीस, पुणे.
२. राज्य गुणवत्ता समन्वयक, महाराष्ट्र राज्य ग्रामीण विकास संस्था
३. अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र राज्य ग्रामीण विकास संस्था
४. वित्तीय नियंत्रक (प्रमग्रासयो) बांधकाम भवन , ग्रा.वि.वि.
५. कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र राज्य ग्रामीण विकास संस्था
६. सचिव, मु.मं.ग्रा.स.यो. यांचे स्वीय सहायक
७. निवड नस्ती (पंरा-७), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट मुंबई.